पदस्थापनेतील अंशत: बदलाबाबत
**श्री. अजय पुरुषोत्तम देऊळकर,**
**अधिव्याख्याता, यंत्र अभियांत्रिकी**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : न्यायाप्र-२८२१/प्र.क्र.२५/२१/तांशि-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०४ जानेवारी, २०२२.

संदर्भ :- १) शासन आदेश, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. बदली-४३२१/७४/२१/तांशि-७, दि.०९/०८/२०२१.
२) मा. महाराष्ट्र न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ नागपूर यांचे आदेश, दि.०३/११/२०२१.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशान्वये अधिव्याख्याता, शासकीय तंत्रनिकेतने व तत्सम संस्था, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ यांच्या नियतकालिक बदल्यांचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्यामध्ये श्री. अजय पुरुषोत्तम देऊळकर, अधिव्याख्याता, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर यांची शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी येथे प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात आली होती. त्यानुसार श्री. देऊळकर हे शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी येथे दि.२६/०८/२०२१ रोजी रुजू झाले आहेत. तथापि, सदर बदली रद्द करण्यासाठी श्री. देऊळकर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे मूळ अर्ज क्र.८३१/२०२१ अन्वये दावा दाखल केला होता. सदर न्यायालयीन प्रकरणी मा. न्यायाधिकरणाने दि.०३/१/२०२१ रोजी, श्री. देऊळकर यांनी सादर केलेल्या पसंतीक्रमानुसार रिक्त पद विचारात घेऊन त्यांच्या बदलीची कार्यवाही करण्याबाबत अंतिम आदेश दिले आहेत.

त्यानुषंगाने श्री. अजय पुरुषोत्तम देऊळकर, अधिव्याख्याता, यंत्र अभियांत्रिकी यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ नागपूर यांच्या दि.०३/११/२०२१ रोजीच्या आदेशानुसार श्री. अजय पुरुषोत्तम देऊळकर, अधिव्याख्याता, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्यात येत असून त्यांची सुधारित पदस्थापना त्यांच्या नावापुढे स्तंभ-५ येथे दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अध्यापकाचे नाव व पदनाम | शासन आदेश दि.०९/८/२०२१ निर्गमित होण्यापूर्वीचे कार्यरत ठिकाण | शासन आदेश दि.०९/८/२०२१ नुसार बदलीने पदस्थापनेचे ठिकाण | पदस्थापनेत अंशत: बदल करुन सुधारित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.अजय पुरुषोत्तम देऊळकर, अधिव्याख्याता, यंत्र अभियांत्रिकी | शासकीय तंत्रनिकेतन, अचलपूर | शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी | शासकीय तंत्रनिकेतन, आर्वी |

२. सदर आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून ते तात्काळ अंमलात येतील.

३. उपरोक्त अध्यापकास शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

४. उक्त अध्यापकास संबंधित प्राचार्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व सदर अध्यापकाने त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. याबाबतचा पाठपुरावा संबंधित विभागीय तंत्रशिक्षण सहसंचालक यांनी करावा व त्याबाबतचा कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१०५११०५०८२५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2022.01.05 11:08:02 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.अजय पुरुषोत्तम देऊळकर, अधिव्याख्याता, यंत्र अभियांत्रिकी (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.राज्यमंत्री,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई/ नागपूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
७) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी/ आर्वी (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षक), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
९) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
१०) निवडनस्ती- (तांशि -७).